**जलसंपदा विभागांतर्गत प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी "ई- प्रशिक्षण माहिती व्यवस्थापन व मूल्यमापन प्रणालीचा (ई-टाईम्स-आवृत्ती २.०)" वापर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. ई-प्रशा-१८२५/११५/प्र.क्र.२८/ निवसं-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ मे, २०२५

**वाचा:** शासन निर्णय क्र. ईप्रमं-२०१७ /(४३/२०१७)/ निवसं-३ दि. १०/०४/२०१७

**प्रस्तावना:**

जलसंपदा विभागांतर्गत महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक व त्या अंतर्गत सर्व प्रादेशिक प्रशिक्षण केंद्रातील प्रशिक्षण व्यवस्थापन, क्षेत्रिय स्तरावरुन प्रशिक्षणास नामांकने पाठविण्यासाठी आणि अधिकारी/कर्मचारी यांची राज्य प्रशिक्षण धोरणानुसार निवड करण्यासाठी सदर्भीय शासन निर्णयान्वये "e-Training Information Management and Evaluation (e-TIMES) [ई- प्रशिक्षण माहिती व्यवस्थापन व मूल्यमापन प्रणाली (ई-टाईम्स)]" या प्रणालीचा वापर दिनांक १०/०४/२०१७ पासून अनिवार्य करण्यात आला होता.

या प्रणालीची अद्यावत आवृत्ती ई-टाईम्स-आवृत्ती २.० विकसित करण्यात आली आहे. या अद्यावत आवृत्तीमध्ये आता जलसंपदा विभागाकडील पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय पुणे, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ पुणे या कार्यालयांमार्फत देखील प्रशिक्षण कार्यक्रम राबविले जात असल्याने या संस्थाचा समावेश करणे विचाराधीन होते.

प्रशिक्षण संस्थांना वर्षभरातील प्रशिक्षण कार्यक्रमांची आखणी करणे, पायाभूत प्रशिक्षणाचे (Induction Training) नियोजन करणे, प्रशिक्षण कार्यक्रम प्रकाशित करणे, वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमांची माहिती सर्व अधिकारी/कर्मचारी यांचेपर्यंत पोहचविणे, अधिकारी/कर्मचारी यांचेकडुन प्रशिक्षणासाठी ऑनलाईन नामांकने मागविणे, प्रशिक्षणार्थीची निवड करुन त्यांना त्याबाबत प्रणालीमार्फत अवगत करणे, प्रशिक्षणाचे मूल्यमापन करणे, प्रशिक्षणाचे प्रमाणपत्र देणे, अधिकारी/ कर्मचारी यांचे प्रशिक्षण उपस्थिती अहवाल संनियंत्रण करणे, सुविधा असल्यास वसतीगृह व्यवस्थापन व प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत प्रशिक्षणार्थीचे अभिप्राय नोंदवणे, प्रशिक्षकांचे मानधनाची नोंद घेणे इ. बाबी प्रणालीमार्फत करणेची सुविधा उपलब्ध करून देण्यात येत आहे. प्रशिक्षण व्यवस्थापनाशी निगडीत बाबींमध्ये सुसूत्रता, गतिमानता आणणे तसेच संनियंत्रण करणेसाठी अद्यावत प्रशिक्षण प्रणाली ई-टाईम्स-आवृत्ती २.० क्षेत्रीय कार्यालयांना तसेच प्रशिक्षण संस्थांना उपलब्ध करून देणे व सदर प्रणालीचा वापर अनिवार्य करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णयः**

**१.०** जलसंपदा विभागातर्गत अधिकारी व कर्मचाऱ्यांना विविध कौशल्याचे प्रशिक्षण देण्यासाठी त्यांची नामांकने प्राप्त करणे व प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी यापुढे ई-टाईम्स-आवृत्ती २.० या प्रणालीचा वापर अनिवार्य करण्यात येत आहे.

**२.०** प्रशिक्षण व्यवस्थापन व नामांकने यासाठी प्रशिक्षण संस्था, प्रशिक्षण व्यवस्थापक, प्रशिक्षणार्थी व प्रशिक्षक या चारही घटकांचा समावेश असून त्यांचे कार्य व जबाबदा-या खालील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

**२.० प्रशिक्षण संस्थाः**

**२.१** जलसंपदा विभागांतर्गत महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक, प्रादेशिक प्रशिक्षण केंद्रे, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय पुणे तसेच जलसंपदा ई-प्रशासन मंडळ पुणे यांनी प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" या प्रणालीचा वापर करावा. प्रशिक्षण संस्थांना वर्षभरातील प्रशिक्षण कार्यक्रमांची आखणी करणे, पायाभूत प्रशिक्षणाचे (Induction Training) नियोजन करणे, प्रशिक्षण कार्यक्रम प्रकाशित करणे, वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमांची माहिती सर्व अधिकारी/कर्मचारी यांचेपर्यंत पोहचविणे, अधिकारी / कर्मचारी यांचेकडुन प्रशिक्षणासाठी ऑनलाईन नामांकने मागविणे, प्रशिक्षणार्थीची निवड करुन त्यांना त्याबाबत प्रणालीमार्फत अवगत करणे, प्रशिक्षणाचे मूल्यमापन करणे, प्रशिक्षणाचे प्रमाणपत्र देणे, अधिकारी / कर्मचारी यांचे प्रशिक्षण उपस्थिती अहवाल संनियंत्रण करणे, सुविधा असल्यास वसतीगृह व्यवस्थापन व प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत प्रशिक्षणार्थीचे अभिप्राय नोंदवणे, प्रशिक्षकांचे मानधनाची नोंद घेणे इ. बाबी प्रणालीमार्फत करणेची कार्यवाही करावी.

**२.२** प्रशिक्षण संस्थांनी दर वर्षी ३१ मार्च पर्यंत पूढील वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमाची आखणी "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" वर प्रसिध्द करावी.

**२.३** प्रशिक्षण संस्थांनी "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" द्वारे प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी स्वतंत्र समन्वय अधिकारी नियुक्त करावा. समन्वय अधिकाऱ्याने "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" प्रणालीबाबत पूर्ण माहिती करून घ्यावी. क्षेत्रीय अधिकारी/ कर्मचारी यांना प्रणाली वापरताना येणा-या अडचणीबाबतचे निराकरण करावे.

प्रणाली मध्ये तांत्रिक अडचणी उद्भवल्यास समन्वय अधिकाऱ्यामार्फत अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, पुणे यांच्या निदर्शनास आणून द्याव्यात व ई-प्रशासन मंडळाने तांत्रिक अडचणीचे निराकरण तातडीने करावे.

२.४ प्रशिक्षण संस्थांनी प्राप्त नामांकनानुसार व प्रशिक्षणाच्या क्षमतेनुसार प्रशिक्षणाची तुकडी (Batch) तयार करून प्रशिक्षण पार पाडावे.

**३.० प्रशिक्षण व्यवस्थापक :**

जलसंपदा विभागात कार्यरत सर्व सहायक मुख्य अभियंते, सहायक/ उप अधीक्षक अभियंते यांना त्यांच्या प्रदेशांतर्गत व मंडळाच्या अधिपत्याखाली असणा-या सर्व कार्यालयांसाठी प्रशिक्षण व्यवस्थापक म्हणून घोषित करण्यात येत आहे. प्रशिक्षण व्यवस्थापकांनी त्यांच्या अंतर्गत असलेल्या अधिका-यांची नामांकने प्रशिक्षण संस्थांकडे प्रचलीत पध्दतीने न पाठवता "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" प्रणालीमधूनच पाठवावीत. तसेच प्रणाली बाबत आपले अंतर्गत कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांना अवगत करावे. सर्व अधिकारी/ कर्मचारी यांचे प्रशिक्षण पासबुक तयार करून ते नियमित भरावे व वर्षातून एकदा प्रशिक्षण व्यवस्थापकाकडून प्रमाणित करावे.

**४.० प्रशिक्षणार्थीः**

**४.१** प्रशिक्षण संस्थांनी घोषित केलेल्या वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमाच्या अनुषंगाने जलसंपदा विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी नामांकने "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" या प्रणालीद्वारे सादर करावी.

**४.२** ज्या प्रशिक्षणार्थीनी प्रशिक्षणासाठी स्वत: नामांकने दिलेली आहेत, त्यांची त्या त्या प्रशिक्षणासाठीची विनंती हि त्यांच्या कार्यालय प्रमुखाकडून मान्य/अमान्य करून घेणे आवश्यक राहील. कार्यालय प्रमुखाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षणार्थीना प्रशिक्षणास उपस्थित राहण्याबाबत वेळोवेळी सुचित करावे. तसेच कार्यालय प्रमुखाने सदर प्रशिक्षणासाठीची विनंती हि ७ दिवसांच्या आत मान्य/अमान्य करणे आवश्यक आहे, तसे न झाल्यास सदर विनंती प्रणालीद्वारे स्वीकृत करून पुढील कार्यवाही केली जाईल.

**५.० प्रशिक्षक:**

प्रशिक्षक यांनी प्रशिक्षणार्थी यांची उपस्थिती नोंदवणे, प्रशिक्षणाचे मूल्यमापन करणे, प्रशिक्षणाचे प्रमाणपत्र देणे, अधिकारी/ कर्मचारी यांचे प्रशिक्षण उपस्थिती अहवाल संनियंत्रण करणे, संबंधित प्रशिक्षणाचे अनुषंगाने आवश्यक अभ्यास साहित्य, परीक्षा इत्यादीसाठीचे आवश्यक बाबी उपलब्ध करून इ. कामे नेमून दिलेल्या प्रशिक्षणासाठी करणे बाबतची सुविधा सदर प्रणालीमध्ये देण्यात आली असून सदर सुविधेचा योग्य वापर करावा.

**६.० प्रणाली व्यवस्थापक:**

**६.१** जलसंपदा ई-प्रशासन मंडळ अंतर्गत असलेल्या कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणीकरण विभाग, पुणे या कार्यालयांमधील एका अधिकाऱ्याची "ई-टाईम्स-आवृत्ती २.०" बाबत प्रणाली व्यवस्थापक म्हणून नेमणूक करण्यात यावी. प्रणाली व्यवस्थापकाने प्रणाली मध्ये येणाऱ्या तांत्रिक अडचणीचे निराकरण प्रणाली विकसकाकडून करून घ्यावे.

**६.२** प्रणाली वापराच्या सुलभतेसाठी प्रणालीचे User Manual, Training Videos इत्यादी बाबी प्रणालीमध्ये उपलब्ध करून देणे व ते अद्यावत ठेवणेची कार्यवाही करावी.

६.३ क्षेत्रीय कार्यालयांनी मागणी केल्यास प्रणाली बाबत Online प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५१६१४०३५८३१२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ROSHAN D HATWAR

Digitally signed by ROSHAN D HATWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2c41dde0ab4f34d52dad42ef03a247acd26cea4a91526825d0207dc554a5c95b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8EF4F4F5AD5B9182ED15A88251CB774BEC785153ADED34E24ED69435C996B170, cn=ROSHAN D HATWAR
Date: 2025.05.16 14:06:17 +05'30'

**( रोशन हटवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी :-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री, जलसंपदा (गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री, जलसंपदा (विदर्भ, तापी व कोकण खोरे विकास महामंडळ) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
५) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, माहीती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
७) महासंचालक, यशदा, पुणे.
८) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
११) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव/सहसचिव (सेवा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१३) सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१५) सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) जलसंपदा विभागातील सर्व प्रशिक्षण संस्था